राज्य शासनातील कर्मचाऱ्यांना तसेच महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना लागु असलेल्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन (NPS) योजनेबाबतची (स्तर-१)कार्यपध्दती

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांकः अंनियो-२०१५/(NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०६ एप्रिल, २०१५.

वाचा -

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५.

२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००७/१८/सेवा-४, दि.०७.०७.२००७.

३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००७/प्र.क्र.६९/सेवा-४, दि.३०.०१.२००९.

४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००९/प्र.क्र.०१/सेवा-४, दि.१२.११.२०१०.

५) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१०१०/प्र.क्र.६७/सेवा-४, दि.१४.१२.२०१०

६) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः भाप्रसे-२५०६/प्र.क्र.३६०/०६/०९, दि.१५.०२.२०१३

७) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः भाप्रसे-२५०६/प्र.क्र.३६०/०६/०९, दि.०१.०८.२०१३.

८) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः संकीर्ण-१००९/प्र.क्र.३९/कोषा-प्रशा-५, दि.०४.१०.२०१३.

९) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः भाप्रसे-२५०९/प्र.क्र.३६५/०९/०९, दि.११.०२.२०१३.

१०) सामान्य प्रशासन विभाग शुध्दीपत्र क्रमांकः भाप्रसे-२५०९/प्र.क्र.३६५/०९/०९, दि.१०.०३.२०१४.

११) सामान्य प्रशासन विभाग शासन पूरकपत्रक क्रमांकः भाप्रसे-२५०६/प्र.क्र.३६०/०६/०९, दि.२४.०३.२०१४.

१२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१४/प्र.क्र.४५/सेवा-४, दि.०८.०५.२०१४.

१३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१२/प्र.क्र.९६/सेवा-४, दि.२७.०८.२०१४.

**प्रस्तावना -**

संदर्भ क्रमांक १ येथे नमूद शासन निर्णयान्वये दिनांक ०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी राज्यात केंद्र शासनाच्या धर्तीवर परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना लागू करण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक १३ येथील आदेशान्वये राज्य शासन केंद्र शासनाच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत सहभागी होईल असा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यामुळे यापुढे परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे नामकरण "राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना"(NPS) असे करण्यात आले आहे.

या संदर्भात केंद्र शासनाने स्थापित केलेल्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना विश्वस्तमंडळ (NPS Trust) यांच्या बरोबर तसेच केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA) म्हणून मे. एन.एस.डी.एल.-ई-गव्हर्नन्स इन्फ्रास्ट्रक्चर लि. (National Securities Depositories Limited-e-Governance Infrastructure Limited) यांच्याशी सुध्दा दिनांक १०/१०/२०१४ रोजी शासनाने करार केला आहे.

त्यामुळे राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेच्या स्तर-१ ची राज्यांतर्गत अंमलबजावणी करण्यासाठी शासन याव्दारे आवश्यक ती कार्यपद्धती विहीत करीत आहे.

**शासन निर्णय -**

१) दिनांक १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर राज्य शासनाच्या सेवेत नियुक्त झालेले / होणारे सर्व कर्मचारी तसेच दिनांक ०१/०१/२००४ रोजी वा त्यानंतर सेवेत नियुक्त झालेले / होणारे महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांना राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना लागू होईल.

२) संबंधित कर्मचाऱ्यांची नियमित/मान्यताप्राप्त पध्दतीशिवाय इतर प्रकारे (उदा., कंत्राटी पध्दतीने, विशिष्ट सिमीत कालावधीकरीता, एखाद्या प्रकल्पाकरीता, या प्रकल्पाच्या कालावधी पुरता किंवा इतर कोणत्याही अनियमीत पध्दतीने) नियुक्ती झाली असल्यास अशा कर्मचाऱ्यांस राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू राहणार नाही. शासकीय सेवेत नियुक्त होणाऱ्या प्रत्येक कर्मचाऱ्याची नियुक्ती विहित पध्दतीने, नियमीत वेतनश्रेणीत असणाऱ्या नियमित पदावर शासनातील सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने झाली आहे याची खात्री करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील.

**या योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता खालील कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.**

३) **केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण :-** राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सर्व अधिकारी व कर्मचारी यांना कायम निवृत्तीवेतन लेखा क्रमांक देणे, जमा होणाऱ्या रकमांप्रित्यर्थचे अभिलेख जतन करणे, त्याचे परिरक्षण करणे आणि या संदर्भात निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण यांनी राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेसंदर्भातील नेमून दिलेली इतर सर्व कामे पार पाडण्याची जबाबदारी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांची राहील. त्याचप्रमाणे राज्य शासनाशी केलेल्या करारातील अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांची राहील.

४) **राज्य समन्वय अधिकाऱ्यांचे नोंदणीकरण (SNO):-** राज्य शासनाने संचालक, लेखा व कोषागारे यांची राज्य समन्वय अधिकारी म्हणून, आणि राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाची राज्य समन्वय कार्यालय म्हणून संदर्भ क्रमांक १३ अन्वये नियुक्ती केली आहे. त्यामुळे संचालक, लेखा व कोषागारे यांनी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे राज्य समन्वय अधिकारी म्हणून नोंदणी करवून घ्यावी.

५) **कोषागार अधिकारी यांचे डीटीओ (DTO) म्हणून नोंदणीकरण:-** प्रत्येक कोषागार अधिकारी यांनी फॉर्म एन-२ मध्ये माहिती भरून ती राज्य समन्वय अधिकाऱ्यांमार्फत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे पाठवून, डीस्ट्रीक्ट ट्रेझरी ऑफीसर (DTO) म्हणून नोंदणी करवून घ्यावी.

६) केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे नोंदणी झाल्यानंतर त्यांच्याकडून प्राप्त होणारे सांकेतांक सुरक्षितरित्या जतन करून त्याच्या योग्य त्या वापराची जबाबदारी राज्य समन्वय अधिकारी तसेच संबंधीत कोषागार अधिकारी यांची राहील.

७) **आहरण व संवितरण अधिका-यांचे नोंदणीकरण (DDO):-** प्रत्येक आहरण व संवितरण अधिकाऱ्याने विहीत नमुन्यात आवश्यक ती माहिती भरुन ती संबंधित कोषागार अधिकाऱ्यांमार्फत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे नोंदणी करण्याकरीता पाठवून स्वत:ची आहरण व संवितरण अधिकारी (DDO) म्हणून नोंदणी करुन घ्यावी. याबाबत संबंधित कोषागार अधिकाऱ्यांनी राज्य समन्वय अधिकारी यांना अवगत करावे. आहरण व संवितरण अधिकारी यांना नोंदणी क्रमांक दिल्यानंतर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांनी त्याबाबत राज्य समन्वय अधिकारी, संबंधीत कोषागार अधिकारी व संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांना कळवावे.

८) **वर्गणीदार कर्मचाऱ्यांची राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत नोंदणी:-** राज्य शासनाच्या सेवेत दिनांक ०१/०४/२०१५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या नोंदणीकरणाची पध्दत त्यापूर्वीच्या कर्मचाऱ्यांच्या संदर्भातील पध्दतीपेक्षा वेगळी राहील. याबाबतचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

**(अ) राज्य शासनाच्या सेवेत दिनांक ०१/०४/२०१५ पूर्वी नियुक्त झालेले कर्मचारी :-**

९) ज्यांची नोंदणी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत यापूर्वीच झाली असून ज्यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना क्रमांक (PPAN) प्राप्त झालेला आहे अशा कर्मचाऱ्यांनी नमुना एस-१ (जोडपत्र १) या निवृत्तीवेतन निधि विनियामक व विकास प्राधिकरणाने (PFRDA) ठरवून दिलेल्या नमुन्यात सर्व माहिती परिपूर्णरित्या भरावी.

१०) सदर नमुना एस-१ हा सेवार्थ या प्रणालीवर भरलेल्या माहितीवरुन आपोआप तयार होईल. त्याच्या तीन प्रती मुद्रीत करुन घ्याव्यात. त्यावर योग्य ठिकाणी कर्मचाऱ्याचे छायाचित्र चिकटवून आणि स्वाक्षरी करुन तो नमुना आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे सादर करावा. सदर नमुन्याच्या तीन प्रतींपैकी एक प्रत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी त्यांच्या अभिलेखामध्ये कार्यालयीन प्रत म्हणून जतन करुन ठेवावी. उर्वरित दोन्ही प्रती कोषागार अधिकाऱ्याकडे पाठवाव्यात. कोषागार अधिकाऱ्याने यापैकी एक प्रत कोषागाराच्या अभिलेखात जतन करुन ठेवावी आणि दुसरी प्रत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे पाठवावी.

११) आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व कर्मचाऱ्यांकडून अशा प्रकारचे एस-१ नमुन्यातील सर्व अर्ज एकत्रित करुन, प्रत्येक अर्जावर आवश्यक तेथे स्वाक्षरी करुन असे अर्ज कोषागार अधिकाऱ्यामार्फत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे सादर करावे. सदर अर्ज सादर करतांना त्या सोबत कर्मचाऱ्यांची नावे व त्यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना क्रमांक (PPAN) ही माहिती असलेली यादी सोबत जोडावी.

१२) अशा प्रकारचे सर्व अर्ज यादीसह केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे निवृत्तीवेतन निधि विनियामक व विकास प्राधिकरणाने (PFRDA) नेमून दिलेल्या एस-५ (जोडपत्र २) पत्रासोबत जोडून पाठवावे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सदरचे अर्ज व यादी संबंधित कोषागार अधिकाऱ्यांमार्फत पाठविणे आवश्यक आहे. संबंधित कोषागार अधिकारी यांनी या संदर्भातील करण्यात यावयाच्या

पत्रव्यवहाराची एक प्रत त्यांच्या अभिलेखात जतन करुन ठेवावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे जमा होणाऱ्या एस-१ नमुन्यातील अर्ज जसजसे प्राप्त होतील तसतसे कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठवावे. सर्व कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त होईपर्यंत थांबू नये. कोषागार अधिकारी यांनीसुध्दा आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून सर्व अर्ज प्राप्त होण्याची वाट न बघता त्यांच्याकडे प्राप्त झालेले अर्ज केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे पाठवावे. केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून अशा सर्व कर्मचाऱ्यांना कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (Permanent Retirement Account Number-PRAN) देण्यात येईल.

१३) वर दर्शविलेली सर्व कार्यवाही तात्काळ (दिनांक ३०/०४/२०१५पर्यंत) पूर्ण करण्यात यावी.

१४) **राज्य शासकीय कर्मचाऱ्याची स्वीयेतर सेवेतील नियुक्ती:-** राज्य शासनातील या योजनेखालील, ज्याला परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना क्रमांक (PPAN) प्राप्त झालेला आहे, असा कर्मचारी स्वीयेतर सेवेतील पदावर नियुक्त झाल्यास, त्याच्या संवर्ग नियंत्रक अधिकाऱ्यांनी अशा कर्मचाऱ्याकरीता नमुना एस-१ तयार करावा व तो संवर्ग नियंत्रक अधिकाऱ्यांचे कार्यालय ज्यांच्या कार्यकक्षेत स्थित असेल अशा संबंधित कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठवावा. संबंधित कोषागार अधिकाऱ्यांनी सदर नमुना केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे पाठवावा. केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाने अशा कर्मचाऱ्याची नोंदणी करुन त्यास कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (PRAN) द्यावा व तो कर्मचाऱ्याच्या संवर्ग नियंत्रक अधिकाऱ्याकडे पाठवावा. त्यांनी तो स्वीयेतर नियोक्त्यास कळवावा. अशा कर्मचाऱ्याकडून मासिक अंशदानाच्या रकमेची कपात करण्याची जबाबदारी स्वीयेतर संस्थेची राहील. अशी स्वीयेतर संस्था ज्या कोषागाराच्या कार्यकक्षेत स्थित असेल त्या संबंधित कोषागार अधिकाऱ्याकडे कर्मचाऱ्याचे मासिक अंशदान आणि नियोक्त्याचे मासिक अंशदान यांच्या रकमा दरमहा, कर्मचाऱ्याच्या संपूर्ण तपशिलासह आणि वसूलीच्या अनुसूचीच्या प्रतींसह तसेच धनाकर्षासह अथवा इलेक्ट्रॉनिक पध्दतीने प्रदानास पाठवाव्यात. अशा स्वीयेतर संस्थेने कोषागार अधिकाऱ्याकडे कर्मचाऱ्याचे तसेच नियोक्त्याचे अंशदान यांच्या दोन्ही रकमा एकाच वेळी एकाच धनाकर्षाव्दारे पाठवाव्यात, वेगवेगळे धनाकर्ष पाठवू नये. असे धनाकर्ष "जिल्हा कोषागार अधिकारी" यांच्या नावे काढण्यात यावे. संबंधित कोषागार अधिकाऱ्याने वेगवेगळे धनाकर्ष अथवा केवळ कर्मचाऱ्याच्या अंशदानाची रक्कम असलेला धनाकर्ष स्वीकारु नये. याबाबतची जबाबदारी संबंधित स्वीयेतर संस्थेच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील. कोषागार अधिकाऱ्याने सदर धनाकर्ष त्याच्या बँक खात्यात जमा करावेत. त्याचप्रमाणे अशा सर्व रकमा संबंधित लेखाशिर्षाखाली जमा कराव्यात आणि अशा कर्मचाऱ्यांची माहिती सेवार्थ प्रणालीत भरावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून प्राप्त होणाऱ्या अशा सर्व कर्मचाऱ्यांच्या रकमांच्या लेख्यांचे जतन करण्याची जबाबदारी संबंधित कोषागार अधिकाऱ्यांची राहील. प्रथम नियुक्तीच्यावेळी स्वीयेतर सेवेतील पदावर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसंदर्भात देखील उपरोक्तप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१५) खाली नमूद केलेल्या परिच्छेद ३२ व ३३ मध्ये दर्शविलेल्या कार्यपध्दतीप्रमाणे अशा सर्व कर्मचाऱ्यांच्या अंशदानाच्या संदर्भात संबंधित सबस्क्रायबर कॉन्ट्रीब्युशन फाईल्स (SCF) तयार करण्याची तसेच त्या केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाच्या संगणक प्रणालीमध्ये अपलोड करण्याची जबाबदारी संबंधित कोषागार अधिकाऱ्यांची राहील.

**(ब) राज्य शासनाचे दिनांक ०१/०४/२०१५ पासून शासन सेवेत रुजू होणारे कर्मचारी :-**

१६) दिनांक ०१/०४/२०१५ पासून शासन सेवेत रुजू होणाऱ्या कर्मचाऱ्यांची माहिती आहरण व संवितरण अधिकारी यांनी सेवार्थ या संगणक प्रणालीत भरावी. नमुना एस-१ ची प्रणालीतील माहिती कोषागार अधिकारी यांच्याकरीता सेवार्थ प्रणालीमध्ये उपलब्ध होईल. संबंधित कोषागार अधिकारी प्रणालीवर त्यास कोषागारात सदर नमुना प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून तीन कामाच्या दिवसात मान्यता देतील. नमुना एस-१ च्या मुद्रीत प्रती यापुढे कोषागार अधिकाऱ्याकडे पाठविण्याची आवश्यकता राहणार नाही. कोषागार अधिकाऱ्यांनी मान्यता दिल्यानंतर सेवार्थ प्रणालीमध्ये अशा कर्मचाऱ्याकरीता डिसीपीएस क्रमांक (PPAN) तयार होईल. संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक ०७/०७/२००७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ९, १२ व १३ प्रमाणे पुढील कार्यवाही कोषागार अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी करावी. डिसीपीएस क्रमांक (PPAN) आहरण व संवितरण अधिकाऱ्याला कळविण्यास होणाऱ्या विलंबास कोषागार अधिकारी जबाबदार राहील.

१७) त्यानंतर उपरोक्त परिच्छेद क्रमांक ९ ते १२ मध्ये दर्शविल्याप्रमाणे कार्यवाही संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

१८) राज्य शासनाच्या सेवेतील कर्मचाऱ्याची स्वीयेतर सेवेतील पदावर नियुक्ती झाल्यास, उपरोक्त परिच्छेद क्रमांक-१४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करण्याची जबाबदारी त्याच्या संवर्ग नियंत्रक अधिकारी, स्वीयेतर संस्था, स्वीयेतर संस्थेतील आहरण व संवितरण अधिकारी आणि संबंधित कोषागार अधिकारी यांची राहील.

**(क) अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकारी :-**

१९) ज्यांना यापूर्वी राज्य अभिलेख देखभाल अभिकरणामार्फत कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (PRAN) प्राप्त झालेला आहे, तसेच ज्यांना तो दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंत प्राप्त होईल, त्यांच्या प्रकरणी वेगळ्याने काही कार्यवाही करण्याची आवश्यकता नाही. तथापि, दिनांक ०१/०४/२०१५ पासून पुढे महाराष्ट्र संवर्गात रुजू होणाऱ्या अधिकाऱ्यांच्या संदर्भात परिच्छेद १६ व १७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे कार्यपध्दती लागू राहील. अशा अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांच्या संदर्भात त्यांच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी परिच्छेद १६ व १७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे कार्यवाही करावी.

२०) दिनांक ०१/०४/२०१५ पासून महाराष्ट्र संवर्गात महाराष्ट्र शासनाच्या मालकीच्या आणि / किंवा संनियंत्रणाखालील अथवा महाराष्ट्र शासनाच्या नियंत्रणाखालील स्वीयेतर सेवेत रुजू होणाऱ्या अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना जर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून पूर्वीच PRAN क्रमांक प्राप्त झाला असेल तर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाच्या सूचनांप्रमाणे तो IRA (Individual Retirement Account) compliant आहे अथवा नाही याबाबत संबंधित अधिकाऱ्यांनी आणि सामान्य प्रशासन विभाग, गृह विभाग व महसूल व वन विभागातील (जे लागू असेल त्याप्रमाणे) सहाय्यक राज्य समन्वय अधिकारी (म्हणजे सहाय्यक संचालक (लेखा)), (संदर्भ क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या शासन निर्णयाप्रमाणे) केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाच्या संकेत स्थळावर (वेब साईटवर) उपलब्ध असणाऱ्या सूचनांनुसार तपासणी करावी आणि नसल्यास तो IRA compliant करण्याकरीता योग्य ती कार्यवाही करावी.

दिनांक ०१/०४/२०१५ पासून महाराष्ट्र संवर्गात रुजू होणाऱ्या अशा अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना जर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून पूर्वी PRAN क्रमांक प्राप्त झाला नसेल तर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून असा PRAN क्रमांक प्राप्त करण्याकरीता उपरोक्त

परिच्छेद-१४ मध्ये दर्शविलेली कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित सहाय्यक राज्य समन्वय अधिकाऱ्यांची राहील.

२१) **आंतरराज्य प्रतिनियुक्तीने महाराष्ट्र शासनात रुजू झालेले अखिल भारतीय सेवेतील अधिकारी:-** ज्या अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांना त्यांच्या मूळ संवर्ग / राज्यात PRAN क्रमांक पूर्वीच प्राप्त झाले आहेत, ते अधिकारी आंतरराज्य प्रतिनियुक्तीने राज्य शासनाकडे रुजू झाल्यास त्यांचे PRAN क्रमांक राज्य शासनाकडे वर्ग करुन (inter sector shifting) घेण्याची जबाबदारी ते ज्या कार्यालयात रुजू होतील, त्या कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील. अशा अधिकाऱ्यांची आंतरराज्य प्रतिनियुक्तीनंतर प्रथम नियुक्ती संस्थेत (राज्य शासनाच्या मालकीच्या आणि / किंवा संनियंत्रणाखालील संस्था परंतु ज्या संस्थांतील वेतन कोषागारामार्फत आहरित करण्यात येत नाही) त्यांचा PRAN क्रमांक राज्य शासनाकडे वर्ग करुन (inter sector shifting) घेण्याची व परिच्छेद २० नुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील.

**केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाने कर्मचाऱ्याला कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (Permanent Retirement Account Number- PRAN) देणे :-**

२२) वरील प्रमाणे कर्मचा-याची माहिती नमुना फॉर्म एस-१ मध्ये प्राप्त झाल्यानंतर प्रत्येक कर्मचाऱ्याला केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून एक कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (PRAN) देण्यात येईल. त्याचप्रमाणे प्रत्येक कर्मचाऱ्याला एक प्रान किट दिली जाईल. प्रान क्रमांक व प्रान किट कर्मचाऱ्याच्या संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना पाठविण्यात येईल. संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी प्रान किट सर्व संबंधित कर्मचाऱ्यांना वितरीत करावी. प्रत्येक कर्मचाऱ्याने प्रान किट वरील तपशीलाची खात्री करावी, त्यातील माहितीची अचूकता तपासावी, तसेच टी-पीन (Telephonic Personal Identification Number) व आय-पीन (Internet Personal Identification Number) उपलब्ध असल्याबाबत खात्री करावी. त्या संदर्भात अडचणी असल्यास अशा कर्मचाऱ्यांनी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाशी थेट संपर्क साधावा.

२३) पूर्वी केंद्र शासन अथवा इतर राज्य शासनाच्या सेवेत असणाऱ्या ज्या कर्मचाऱ्यास PRAN क्रमांक प्राप्त झाला आहे असा कर्मचारी पूर्वीची सेवा सोडून राज्य शासनाच्या सेवेत रुजू झाल्यास त्याला पूर्वी मिळालेला PRAN क्रमांक IRA (Individual Retirement Account) compliant आहे अथवा नाही त्याची तपासणी करण्याची आणि नसल्यास तो IRA compliant करण्याची जबाबदारी तो ज्या कार्यालयात नियुक्त होईल त्या कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्याची राहील.

२४) संबंधित अधिकारी / कर्मचारी राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अन्य कार्यालयात बढतीने, पदावनतीने अथवा बदलीने किंवा इतर कोणत्याही कारणामुळे स्थानांतरीत झाल्यानंतरही एकदा दिलेला कायम निवृत्तीवेतन लेखा क्रमांक (PRAN) बदलणार नाही. या प्रान (PRAN) क्रमांकाची नोंद संबंधीत कर्मचाऱ्याच्या वेतन देयक नोंदवहीमध्ये त्याच्या नावासमोर तसेच त्याच्या सेवा पुस्तकात न चुकता घेण्यात यावी.

**मासिक अंशदानाची वसुली :-**

२५) राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या अंशदानाची वसुली तसेच नियोक्त्याच्या अंशदानाचे आहरण दरमहा करण्याची जबाबदारी संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

२६) राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेखालील कर्मचाऱ्यांच्या अंशदानाची वसूली आणि त्यावरील शासनाची / नियोक्त्याची सममुल्य अंशदानाची रक्कम आहरित करण्याबाबतची कार्यवाही वेतन देयकातून एकाच वेळी करण्यात यावी. ज्या लेखाशिर्षामधून संबंधित कर्मचाऱ्याचे वेतन आहरीत केले जाते, त्याच लेखाशिर्षामधून नियोक्त्याचे अंशदान आहरित करण्यात यावे. तसेच दोन्ही प्रकारच्या अंशदानाची रक्कम व तपशिल दर्शविणारी आवश्यक ती अनुसूची वेतन देयकासोबत जोडण्यात यावी.

२७) कर्मचारी व नियोक्त्याचे अंशदान अशा दोन्ही अंशदानाच्या रकमा प्रत्येक महिन्यात अनिवार्यरित्या वसूल करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याची राहील.

२८) राज्य शासनाच्या सेवेतील कर्मचारी तसेच महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्या आणि शासनाच्या सममूल्य अंशदानाच्या अशा दोन्ही वजावटी महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम २५९ (१) नुसार वेतन देयकाच्या दर्शनी भागावर -कोषागार वजाती' म्हणून दर्शविण्यात याव्यात. (सेवार्थ प्रणालीमध्ये या प्रकरणी आवश्यक त्या सुधारणा करण्यात येत आहेत.) कोषागार अधिकारी यांनी या दोन्ही रकमांपैकी राज्य शासकीय कर्मचाऱ्याच्या अंशदानाची रक्कम ८३४२- इतर ठेवी या लेखाशिर्षाखालील ८३४२५०८१ या योजना संकेतांकामध्ये जमा म्हणून दर्शवावी. तसेच नियोक्त्याच्या अंशदानाची वसूल रक्कम ८३४२- इतर ठेवी या लेखाशिर्षाखालील ८३४२५०९९ या योजना संकेतांकामध्ये जमा म्हणून दर्शवावी. अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्याच्या स्वत:च्या अंशदानाची रक्कम ८३४२- इतर ठेवी या लेखाशिर्षाखालील ८३४२५२२१ (भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी), ८३४२५२४१ (भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी) आणि ८३४२५२६८ (भारतीय वन सेवेतील अधिकारी) या योजना संकेतांकाखालील जमा म्हणून तर त्यांच्या संदर्भात नियोक्त्याच्या सममूल्य अंशदानाची रक्कम ८३४२- इतर ठेवी या लेखा शिर्षाखालील अनुक्रमे ८३४२५३६६ (भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी), ८३४२५०२६ (भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी) आणि ८३४२५३७५ (भारतीय वन सेवेतील अधिकारी) या योजना संकेतांकाखालील जमा म्हणून दर्शवावी.

२९) राज्य शासकीय कर्मचारी तसेच महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्याकडून प्राप्त झालेल्या एकूण रकमांचा मेळ घेतल्यानंतर संबंधित कोषागार अधिकाऱ्यांनी कर्मचाऱ्यांचे अंशदान आणि शासनाचे अंशदान या दोन्ही रकमा आहरीत करण्याकरीता साधी पावती नमुना-४५ अ मधील एक देयक कोषागारावर सादर करावे. अशा देयकासोबत कर्मचाऱ्यांची यादी जोडण्याची आवश्यकता नाही. सदर एकूण रक्कम शासनाच्या लेख्यात खर्ची टाकण्यात यावी. अशा खर्चाकरीता वापरावयाच्या लेखाशिर्षासंबंधी शासन आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. कोषागार अधिकाऱ्यांनी प्रत्येक महिन्याच्या ०१ तारखेपासून १८ तारखेपर्यंतच्या देयकांमधील वसूली संदर्भात एससीएफ (SCF) अपलोड केल्यानंतर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून व्यवहार क्रमांक (Transaction ID) प्राप्त झाल्यानंतर एकूण रक्कम इलेक्ट्रॉनिक पध्दतीने विश्वस्त बँकेकडे त्या महिन्याच्या अखेरच्या तारखेच्या आत कोणत्याही परिस्थितीत पाठवावी. दिनांक १९ ते महिन्याच्या अखेरच्या तारखेपर्यंतच्या देयकामधील वसूली संदर्भात एससीएफ (SCF) अपलोड केल्यानंतर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून व्यवहार क्रमांक (Transaction ID) प्राप्त झाल्यानंतर एकूण रक्कम इलेक्ट्रॉनिक पध्दतीने विश्वस्त बँकेकडे पुढील महिन्याच्या १५ तारखेच्या आत कोणत्याही परिस्थितीत पाठवावी. याकरिता सर्व कोषागार अधिकाऱ्यांना तसेच मुंबईमध्ये अधिदान व लेखा अधिकारी यांना निधी आहरित करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. अशाप्रकारे वसूल केलेल्या रकमा गुंतवणुकीकरीता नेमण्यात आलेल्या निवृत्तीवेतन निधी

व्यवस्थापकांकडे पाठविण्यात येणार असल्याने सदर कालमर्यादा पाळण्याची जबाबदारी कोषागार अधिकाऱ्यांवर राहील.

३०) प्रतिनियुक्तीवर असलेल्या राज्य शासनाच्या सेवेतील कर्मचारी / महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्या तसेच नियोक्त्याच्या अंशदानाची रक्कम खाली दर्शविल्याप्रमाणे संबंधित योजना संकेतांकाखाली जमा रक्कम म्हणून दर्शवावी.

| अ.क्र. | प्रवर्ग | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १) | राज्य शासकीय कर्मचाऱ्याच्या अंशदानाची रक्कम | ८३४२- इतर ठेवी, ११७-शासकीय कर्मचाऱ्याकरीता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०२) (०७) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, स्वीयेतर सेवेत असणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याचे अंशदान, स्तर-१ (८३४२-५२१-२), ३२- अंशदाने |
| २) | स्वीयेतर सेवेतील राज्य शासकीय कर्मचाऱ्याच्या संदर्भात स्वीयेतर नियोक्त्याच्या अंशदानाची रक्कम | ८३४२- इतर ठेवी, ११७-शासकीय कर्मचाऱ्याकरीता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१) (०७) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, स्वीयेतर नियोक्त्याचे अंशदान, स्तर-१ (८३४२-५१५-२), ३२-अंशदाने |
| ३) | भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्याच्या अंशदानाची रक्कम | ८३४२- इतर ठेवी, ११७- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१) (०८) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, शासकीय कर्मचाऱ्याचे (भाप्रसे) अंशदान, स्तर-१ (८३४२-५२२-१), ३२- अंशदाने |
| ४) | भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्याच्या अंशदानाची रक्कम | ८३४२- इतर ठेवी, ११७- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१) (०९) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, शासकीय कर्मचाऱ्याचे (भापोसे) अंशदान, स्तर-१ (८३४२-५२४-१), ३२- अंशदाने |
| ५) | भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्याच्या अंशदानाची रक्कम | ८३४२- इतर ठेवी, ११७- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१) (१०) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, शासकीय कर्मचाऱ्याचे (भावसे) अंशदान, स्तर-१ (८३४२-५२६-८), ३२- अंशदाने |
| ६) | स्वीयेतर सेवेतील नियोक्त्याच्या अंशदानाची रक्कम (भारतीय प्रशासन सेवा/ भारतीय पोलीस सेवा/ भारतीय वन सेवा) | ८३४२- इतर ठेवी, ११७- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०१) (०७) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, स्वीयेत्तर नियोक्त्याचे अंशदान, स्तर-१ (८३४२-५१५-२), ३२- अंशदाने |

३१) स्वीयेतर सेवेत असलेल्या राज्य शासकीय कर्मचारी तसेच महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्याकडून प्राप्त झालेल्या एकूण रकमांचा मेळ घेतल्यानंतर संबंधित कोषागार अधिकाऱ्यांनी कर्मचाऱ्यांचे अंशदान आणि शासनाचे अंशदान या दोन्ही रकमा आहरीत करण्याकरीता साधी पावती नमुना-४५ अ मधील एक देयक कोषागारावर सादर करावे. अशा देयका

सोबत कर्मचाऱ्यांची यादी जोडण्याची आवश्यकता नाही. सदर एकूण रक्कम शासनाच्या लेख्यात खर्ची टाकण्यात यावी. अशा खर्चाकरीता वापरावयाच्या लेखाशिर्षासंबंधी शासन आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. सदर रक्कम कोषागार अधिकाऱ्यांनी उपरोक्त परिच्छेद-२९ मध्ये दर्शविलेल्या कालमर्यादेत विश्वस्त बँकेकडे पाठवावी. याकरिता कोषागार अधिकाऱ्यांना तसेच मुंबई येथील अधिदान व लेखा अधिकारी यांना निधी आहरित करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. अशाप्रकारे वसूल केलेल्या रकमा गुंतवणूकीकरिता नेमण्यात आलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकांकडे पाठविण्यात येणार असल्याने सदर कालमर्यादा पाळण्याची जबाबदारी कोषागार अधिकाऱ्यांवर राहील.

**अंशदानाचा तपशिल इलेक्ट्रॉनिक पध्दतीने (SCF द्वारे) केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे पाठविणे :-**

३२) शासकीय सेवेतील कर्मचाऱ्यांच्या तसेच अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या अंशदानाच्या व नियोक्त्याच्या सममूल्य अंशदानाच्या रकमेचा ताळमेळ घेतल्यानंतर संबंधित कोषागार अधिकारी यांनी त्या महिन्याच्या ०१ तारखेपासून १८ तारखेपर्यंतच्या देयकांमधील वसूली संदर्भात अंशदानाचा (कर्मचारी / अधिकारी व नियोक्त्याचे अंशदान यासह) आवश्यक तो संपूर्ण तपशील दर्शविणारी माहिती सबस्क्रायबर कॉन्ट्रीब्युशन फाईल (SCF) च्या स्वरूपात तयार करून केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाच्या संगणक प्रणालीमध्ये त्या महिन्याच्या २५ तारखेपर्यंत अपलोड (Up-Load) करावी. दिनांक १९ ते महिन्याच्या अखेरच्या तारखेपर्यंतच्या देयकामधील वसूली संदर्भात पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत एससीएफ (SCF) तयार करुन ती केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाच्या संगणक प्रणालीमध्ये अपलोड करावी. याशिवाय आवश्यकतेनुसार कोषागार अधिकारी या पेक्षा जास्त वेळा एससीएफ (SCF) तयार करुन ती अपलोड करु शकतील. मात्र अशा वेळी ट्रस्टी बँकेकडे पाठवावयाच्या रकमा, व्यवहार क्रमांक (Transaction ID) प्राप्त झाल्यापासून पाच कामाच्या दिवसांच्या आत विश्वस्त बँकेकडे पाठविणे आवश्यक राहील. अशाप्रकारे वसूल केलेल्या रकमा गुंतवणुकीकरीता नेमण्यात आलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकांकडे पाठविण्यात येणार असल्याने सदर कालमर्यादा पाळण्याची जबाबदारी कोषागार अधिकाऱ्यांवर राहील.

३३) केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण अशा प्रत्येक फाईलकरीता एक व्यवहार क्रमांक (Transaction ID) देतील व तो संबंधित कोषागार अधिकाऱ्यांना कळवतील.

**अंशदानाची रक्कम विश्वस्त बँकेकडे जमा करणे :-**

३४) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांचेकडून ॲक्सिस बँक (Axis Bank) या बँकेस महाराष्ट्र शासनाकरीता विश्वस्त बँक म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. वेळोवेळी निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांचेकडून निश्चित केलेली बँक राज्य शासनाकरीता विश्वस्त बँक म्हणून काम करेल.

३५) केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्या संगणक प्रणालीमध्ये अपलोड (Up-Load) केलेल्या सबस्क्रायबर कॉन्ट्रीब्युशन फाईल (SCF) मधील तपशिलामध्ये दर्शविण्यात आलेल्या सर्व कर्मचा-यांची संपूर्ण रक्कम (कर्मचा-यांचे अंशदान व शासनाचे सममूल्य अंशदान ) कोषागार अधिकारी यांनी वर परिच्छेद क्रमांक २९, ३१ आणि ३२ मध्ये नमुद केलेल्या विहित वेळापत्रकाप्रमाणे इलेक्ट्रॉनिक पध्दतीने अथवा धनादेशाव्दारे विश्वस्त बँकेकडे (Axis Bank) हस्तांतरीत करावी. त्यात उपरोक्त परिच्छेद ३३ मध्ये नमुद केलेल्या व्यवहार क्रमांकाची (Transaction ID) नोंद न चुकता करण्यात यावी.

३६) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरणाकडून (PFRDA) नियुक्त केल्या जाणाऱ्या व राज्य शासनाने याकरीता नामनिर्देशित केलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाकडे (Pension Fund Manager-PFM) गुंतवणूकीकरीता सदरची रक्कम विश्वस्त बँकेकडून हस्तांतरीत करण्यात येईल.

**सेवा शुल्क :-**

३७) या योजनेअंतर्गत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून दिल्या जाणाऱ्या सेवेसाठी राज्य शासनाने त्यांच्याशी केलेल्या करारानुसार सेवा शुल्क आकारले जाईल.

३८) सदर सेवा शुल्क राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून त्रैमासिक दिले जाईल. त्याकरीता प्रत्येक कोषागार अधिकाऱ्याने त्यांच्याकडून संबंधित महिन्यात केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणासोबत केलेल्या व्यवहाराच्या संख्येबद्दलची माहिती राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयास कळवावी.

**दिनांक ०१/०४/२०१५ रोजी किंवा त्यानंतर अभासेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांच्या संदर्भात करावयाची कार्यवाही :-**

३९) **स्वीयेतर सेवेतील अंशदानाची वसूली :-** राज्य शासनाच्या मालकीच्या आणि / किंवा संनियंत्रणाखालील अथवा महाराष्ट्र शासनाच्या नियंत्रणाखालील स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर असलेल्या अभासे अधिकाऱ्यांच्या बाबतीत ज्या शेवटच्या कार्यालयाकडून अधिकारी प्रतिनियुक्तीवर जात असेल त्या कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित अधिकाऱ्यांचा कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (PRAN) त्यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रामध्ये विनिर्दिष्टपणे नमूद करावा व ज्या महिन्यापर्यंत अंशदानाची वसुली करण्यात आली आहे त्याचा तपशील नोंदवावा. स्वीयेतर संस्थेच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अशा अधिकाऱ्याच्या अंशदानाची वसुली मासिक वेतन देयकामधून करावी आणि स्वीयेतर नियाक्त्याच्या समप्रमाण अंशदानासह अशी वसूल केलेली अंशदानाची रक्कम एकाच धनाकर्षाव्दारे, Form -२ च्या दोन प्रतींसह संबंधित स्वीयेतर संस्था ज्या कोषागाराच्या कार्यकक्षेत कार्यरत आहे त्या कोषागार अधिकाऱ्याकडे जमा करावी. कोषागार अधिकाऱ्यांनी सदर धनाकर्ष प्राप्त झाल्याच्या दिनांकानंतरच्या लगतच्या कामाच्या दिवशी स्वत:च्या बँक खात्यात भरावा. कोषागार अधिकाऱ्यांनी त्यानंतर त्या रकमेचा धनादेश काढून तो उपरोक्त परिच्छेद-३० मध्ये दर्शविलेल्या संबंधित लेखाशिर्षाखाली, धनाकर्ष त्यांच्या बँक खात्यात जमा केल्याच्या दिनांकापासून कामाच्या ०३ दिवसांच्या आत शासकीय लेख्यात जमा रक्कम म्हणून जमा करावा आणि त्या प्रित्यर्थच्या चलनाच्या प्रती त्यांच्या अभिलेखात जतन कराव्यात.

४०) **अभासेतील अधिकारी केंद्रीय अथवा आंतरराज्य प्रतिनियुक्तीवर असताना करावयाची कार्यवाही :-** अभासेतील अधिकारी जेव्हा केंद्रात अथवा आंतरराज्य प्रतिनियुक्तीवर जातील तेव्हा त्यांच्या प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वीच्या कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित अधिकाऱ्यांचा कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांक (PRAN) त्यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रामध्ये विनिर्दिष्टपणे नमूद करावा व ज्या महिन्यापर्यंत अंशदानाची वसुली करण्यात आली आहे त्याचा तपशील नोंदवावा. केंद्र अथवा आंतरराज्य प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कार्यरत असताना संबंधित अधिकाऱ्यांचे अंशदान व प्रतिनियुक्तीवरील नियोक्त्याचे सममूल्य अंशदान संबंधित अधिकारी कार्यरत असलेल्या कार्यालयाकडून परस्पर विश्वस्त बँकेकडे जमा करण्यात यावे व त्याचा तपशील केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे पाठविण्यात यावा.

४१) **अभासेतील अधिकारी परदेशी प्रतिनियुक्ती/ अभिहस्तांकनाच्या कालावधीतील अंशदानाची वसूली :-** अभासेतील संबंधित अधिकारी जेव्हा परदेशी प्रतिनियुक्तीवर/ परदेशी अभिहस्तांकनावर (Foreign Assignment) जातील तेव्हा, संबंधित अधिकारी परदेशी प्रतिनियुक्तीवर / परदेशी अभिहस्तांकनावर गेले नसते तर त्यांचे राज्य शासनाच्या सेवेत जे वेतन राहिले असते, ते वेतन (Notional Pay) अधिक त्यावरील महागाई भत्ता याप्रमाणे येणाऱ्या एकूण रकमेच्या १०% एवढे परदेशी प्रतिनियुक्ती/ परदेशी अभिहस्तांकनाच्या कालावधीतील अधिकाऱ्यांचे दरमहा अंशदान व परकीय नियोक्त्याचे सममूल्य अंशदान एकाच धनाकर्षाव्दारे सहाय्यक राज्य समन्वय अधिकारी यांच्याकडे दरमहा जमा करण्याची जबाबदारी संबधित अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांचेवर राहील. असे धनाकर्ष "अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई" यांच्या नावे काढण्यात यावेत. संबंधित सहाय्यक राज्य समन्वय अधिकारी यांनी असे सर्व धनाकर्ष मुंबईतील अधिदान व लेखा अधिकारी यांच्याकडे सर्व आवश्यक त्या माहितीसह तसेच परिच्छेद-३० मध्ये दर्शविलेल्या संबंधित लेखाशिर्षाखाली रक्कम जमा करण्याकरीता चलनाच्या चार प्रती आणि वसुलीप्रित्यर्थच्या अनुसूचीच्या दोन प्रतींसह पाठवावे. अधिदान व लेखा अधिकाऱ्यांनी सदर धनाकर्ष प्राप्त झाल्याच्या दिनांकानंतरच्या लगतच्या कामाच्या दिवशी स्वत:च्या बँक खात्यात भरावा. अधिदान व लेखा अधिकाऱ्यांनी त्यानंतर त्या रकमेचा धनादेश काढून तो सहाय्यक राज्य समन्वयक अधिकाऱ्यांकडून प्राप्त झालेल्या चलनाव्दारे संबंधित लेखाशिर्षाखाली, धनाकर्ष बँक खात्यात जमा केल्याच्या दिनांकापासून कामाच्या ०३ दिवसांच्या आत शासकीय लेख्यात जमा रक्कम म्हणून जमा करावा व चलनांच्या प्रती त्यांचेकडील अभिलेखामध्ये ठेवाव्यात. अशा अभासे अधिकाऱ्यांकडून प्राप्त झालेल्या अधिकाऱ्यांच्या तसेच नियोक्त्याच्या अंशदानाच्या रकमेचा एक धनाकर्ष आणि त्या सोबतची इतर आवश्यक माहिती व कागदपत्रे अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे मुदतीत सादर करण्याची तसेच त्याबाबतचे लेखे त्यांच्या स्तरावर ठेवण्याची जबाबदारी सहाय्यक राज्य समन्वय अधिकारी यांची राहील. त्याचप्रमाणे अधिकाऱ्याच्या अंशदानाच्या व परकीय नियोक्त्याच्या अंशदानाच्या रकमांचा धनाकर्ष कोषागाराच्या बँक खात्यात जमा करण्याची, त्याचा तपशील केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांचेकडे पाठविण्याची आणि रक्कम विश्वस्त बँकेकडे हस्तांतर करण्याची कार्यवाही करण्याची जबाबदारी अधिदान व लेखा अधिकारी यांची राहील.

**<u>ताळमेळ :-</u>**

४२) या योजनेखालील रकमांचा मासिक व त्रैमासिक ताळमेळ कोषागारांकडून विश्वस्त बँकेत पाठविलेल्या रकमांशी घेण्याची जबाबदारी कोषागार अधिकारी यांची राहील. कोषागाराकडे हस्तांतरीत केलेल्या रकमांचा ताळमेळ घेण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

**सध्याच्या योजनेखालील दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंतच्या कर्मचाऱ्यांबाबतची माहिती केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे पाठविणे तसेच जमा झालेली रक्कम विश्वस्त बँकेला पाठविणे :-**

४३) सध्या या योजनेत समाविष्ट असलेल्या दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंतच्या कर्मचाऱ्यांची माहिती केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे केंद्रीकृत पध्दतीने पाठविणे आणि त्या संदर्भातील रक्कम विश्वस्त बँकेकडे केंद्रीकृत पध्दतीने पाठविणे ही जबाबदारी राज्य समन्वय अधिकारी यांची राहील. राज्य शासकीय कर्मचारी तसेच महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्याकडून दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंत प्राप्त झालेल्या एकूण रकमांचा मेळ घेतल्यानंतर लेखा व

कोषागारे संचालनालयाच्या अधिनस्त उपसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांनी, कर्मचाऱ्यांचे अंशदान आणि शासनाचे अंशदान या दोन्ही रकमा आहरीत करण्याकरीता साधी पावती नमुना-४५ अ मधील एक देयक अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे सादर करावे. अशा देयका सोबत कर्मचाऱ्यांची यादी जोडण्याची आवश्यकता नाही. सदर एकूण रक्कम शासनाच्या लेख्यात खर्ची टाकण्यात यावी. अशा खर्चाकरीता वापरावयाच्या लेखाशिर्षासंबंधी शासन आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. सदर रक्कम उपसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांनी विश्वस्त बँकेकडे पाठवावी. याकरिता उपसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांना निधी आहरित करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४४) दिनांक ०१/०४/२०१५ पासून माहिती केंद्रीय देखभाल अभिकरणाकडे पाठविणे आणि सर्व नव्याने नियुक्त होणारे तसेच कार्यरत कर्मचाऱ्यांचे अंशदान ट्रस्टी बँकेकडे पाठविण्याची जबाबदारी संबंधित कोषागार अधिकारी यांची राहील.

**संकीर्ण सूचना :-**

४५) एका कार्यालयातून दुसऱ्या कार्यालयात बदलीने नियुक्त होणाऱ्या / त्याच कार्यालयात बढतीने अथवा पदावनतीने किंवा इतर प्रशासकीय कारणामुळे बदलीने दुसऱ्या पदावर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या संदर्भात शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक संकीर्ण-१०११/सं.क्र.१७/कोषा प्रशा-५, दिनांक १५/१०/२०१३ मधील परिच्छेद क्रमांक -२ व ३ मधील तरतूदी तंतोतंत व काटेकोरपणे पाळणे अनिवार्य राहील. एका महिन्याच्या वेतनातून एकाहून जास्त वेळा या योजनेखालील कपाती केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून स्वीकारल्या जाणार नाहीत. त्यामुळे आहरण व संवितरण अधिकारी आणि कोषागार अधिकारी यांनी याबाबत दक्ष राहून योग्य ती काळजी घ्यावी.

४६) राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना वर संदर्भ क्रमांक २ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील ८, १४, १५, १६, १८, २०, २१, आणि २२ हे परिच्छेद वगळता उर्वरित शासन निर्णय आहे त्या स्वरुपात लागू राहील. तथापि, सदर शासन निर्णयातील परिच्छेद ९ मध्ये नमूद केलेल्या नमुना-१ ऐवजी यापुढे नमुना एस-१ या नमुन्यातील अर्ज कोषागार अधिकाऱ्यांकडे पाठविण्यात येतील.

४७) त्याचप्रमाणे अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांसंदर्भात संदर्भ क्रमांक ६ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील २,५, ६, ७, ८, ९, १४, १५, १६ ,१७, १९, २०, २१, २२, २३, २९, ३१ आणि ३२ हे परिच्छेद वगळता उर्वरित शासन निर्णय आहे त्या स्वरुपात लागू राहील.

४८) ज्या कर्मचाऱ्यांच्या प्रकरणी PRAN क्रमांक प्राप्त झालेले नाहीत व ज्यांच्या प्रणालीतील माहितीमध्ये missing credit रकमांचे चुकीचे वर्गीकरण झाले आहे, अशा प्रकरणी संबंधित कोषागार अधिकाऱ्यांकडे संपर्क साधून झालेली चूक सुधारीत करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

४९) **वजाती होणाऱ्या जादा /कमी अंशदानासंदर्भात अंमलात आणावयाची कार्यपध्दती :** विहीत केलेली १० % (मुळ वेतन + त्यावरील महागाई भत्ता) अंशदानाची रक्कम कर्मचाऱ्याच्या वेतन देयकातून दरमहा वसूल करणे आणि नियोक्त्याचे १०% सममूल्य अंशदान दरमहा जमा करणे याकरीता आहरण व संवितरण अधिकारी जबाबदार राहील. कर्मचाऱ्याच्या खात्यात अंशदानापोटी जादा रक्कम जमा करण्यात आल्यास ती लगतच्या पुढील महिन्यात समायोजित करण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी जबाबदार राहील. तसेच कमी रक्कम जमा करण्यात आल्यास

आवश्यक रक्कम लगतच्या पुढील महिन्यात जमा करण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी जबाबदार राहील.

राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यात जमा करण्यात येत असलेले अंशदान योग्य असल्याची खात्री दरमहा करण्याची जबाबदारी कर्मचाऱ्याची राहील. त्यामध्ये काही त्रुटी आढळल्यास त्याबाबत कर्मचाऱ्याने आहरण व संवितरण अधिकाऱ्यास लेखी निवेदन देणे आवश्यक आहे. जो कर्मचारी याप्रमाणे कार्यवाही करणार नाही तो भविष्यात कोणतीही तक्रार (कायदेशीर कार्यवाही) करु शकणार नाही.

५०) संदर्भ क्रमांक २ येथे नमूद शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक २७ नुसार विशेष दक्षता घेण्यात यावी. अनधिकृत अनुपस्थिती, असाधारण रजा प्रकरणी कर्मचाऱ्याच्या वेतनाचे देयक सेवार्थ प्रणालीतून काढण्यात येणार नाही याची खात्री करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील. महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम २६४ आणि २६५ मधील तरतुदींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्याची राहील. तसेच संदर्भ क्रमांक ८ येथे नमूद शासन निर्णय व त्यासोबतच्या जोडपत्रातील तरतुदींचे पालन करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी आणि कोषागार अधिकारी यांची राहील. या सर्व नियमांचे पालन न झाल्यास आहरण व संवितरण अधिकारी आणि कोषागार अधिकारी हे प्रशासकीय कारवाईसाठी पात्र ठरतील.

५१) कर्मचाऱ्यांच्या कायम निवृत्तीवेतन खाते क्रमांकासंबंधीचे (PRAN) वार्षिक विवरणपत्र दरवर्षी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून संबंधित कर्मचाऱ्यास परस्पर पाठविण्यात येईल. तसेच कोणत्याही वेळी संबंधित कर्मचाऱ्यांच्या खात्यामधील जमा रकमेचा तपशील नोंदणी केलेल्या कर्मचाऱ्यांस त्यांच्या संकेतस्थळावर पाहण्याची व्यवस्था केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण उपलब्ध करुन देईल.

५२) संदर्भ क्रमांक ४ व १२ येथे नमूद केलेले परताव्याच्या अनुषंगाने असलेले शासन निर्णय याव्दारे रद्द करण्यात येत आहेत. तथापि, दिनांक ३१/०३/२०१५ पर्यन्त सेवा त्याग केलेल्या/सेवेत असताना मृत्यु पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या परताव्याचे प्रस्ताव राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने संदर्भ क्रमांक ४ व १२ येथील शासन निर्णयानुसार निकाली काढावेत.

५३) दिनांक ०१/०४/२०१५ पासून पुढे अशाप्रकारच्या परताव्याच्या प्रकरणांवर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाने कार्यवाही करावी.

५४) जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालये, कृषी विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित महाविद्यालये/संस्था, आदिवासी विकास विभागांतर्गत असलेल्या मान्यताप्राप्त व अनुदानित आश्रमशाळा, सामाजिक न्याय विभागांतर्गत असलेल्या मान्यताप्राप्त व अनुदानित शाळा व संस्था, जलसंपदा विभागांतर्गत येणारी महामंडळे यांच्या सेवेत दिनांक ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या / होणाऱ्या कर्मचाऱ्यांकरिता शासन आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

५५) सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०६१२०६३२९१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.06 15:05:16 +05'30'

**ना.भा.रिंगणे**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१२५ प्रती),
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (१०० प्रती),
६) सहसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, मुंबई (१०० प्रती)
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
८) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
९) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
१०) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
११) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
१२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १५ प्रती),
१४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१५) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
१६) राज्यपालांचे सचिव,
१७) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१८) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

१९) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,

२०) *सचिव, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली

२१) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

२२) *कार्यकारी संचालक, निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण, १ ला मजला, ICADR Building, प्लॉट क्र.६, वसंत कुंज, फेज-२, नवी दिल्ली-११० ०७०.

२३) *कार्यकारी उपाध्यक्ष, N.S.D.L. e- Governance Infrastructure Limited, १ ला मजला, टाईम्स टॉवर, कमला मिल कम्पाऊंड, सेनापती बापट मार्ग, लोअर परेल, मुंबई-४०० ०१३.

२४) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,

२५) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,

२६) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

२७) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

२८) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

२९) *प्रबंधक, मुंबई महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण /नागपूर/औरंगाबाद

३०) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.

३१) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)

३२) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२

३३) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.

३४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.

३५) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०

३६) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.

३७) मंत्रालयातील सर्व विभाग,

३८) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

३९) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

४०) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

४१) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष

४२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

४३) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),

४४) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

४५) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),

४६) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),

४७) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४८) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४९) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

५०) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),

५१) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),

५२) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

५३) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),

५४) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),

५५) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),

५६) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)

५७) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)

५८) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)

५९) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )

६०) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )

६१) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )

६२) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)

६३) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

६४) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.

शासन निर्णय क्रमांक अंनियो-२०१५/(NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४, दिनांक ०६ एप्रिल, २०१५ चे जोडपत्र.

# जोडपत्र-१

# APPENDIX-1

**Annexure S1** **Page 1**

## Application for Allotment of Permanent Retirement Account Number (PRAN)

(To avoid mistake(s), please follow the accompanying instructions and examples carefully before filling up the form)

Acknowledgement No.
(To be filled by FC)

Permanent Retirement Account Number :
(To be filled by FC after PRAN generation )

To affix recent Coloured photograph (3.5 cm × 2.5 cm)

Sir/Madam,

I hereby request that a permanent retirement account number be allotted to me.

I give below necessary particulars :

Signature/Left Thumb Impression of Subscriber in black ink

**Section A - Subscribers Personal Details** ( * Indicates Mandatory Field)

1. Full Name (Full expanded name: initials are not permitted)
   Please Tick as applicable, Shri Smt . Kumari
   First Name *
   Middle Name
   Last Name

2. Gender * Please Tick as applicable, Male Female

3. Date of Birth * 4. PAN

D DM MY YY Y (Date of Birth to be Certified by DDO)

5. Father's Full Name:
   First Name *
   Middle Name
   Last Name

6. Present Address:
   Flat/Unit No, Block no. *
   Name of Premise/Building/Village
   Area/Locality/Taluka
   District/Town/City *
   State / Union Territory *
   Country *

   Pin Code *

7. Permanent Address: If same as above, Please Tick ☐ else,
   Flat/Unit No, Block no. *
   Name of Premise/Building/Village
   Area/Locality/Taluka
   District/Town/City *

10. Email ID

11. Subscribers Bank Details : (Please refer instruction no. 4) Savings A/c ☐ Current A/c ☐

Bank A/c Number*

Bank Name*

Bank Branch*

Bank Address*

Pin Code*

Bank IFS Code (If IFS code is not available, then provide MICR)

Bank MICR Code

☐ **Declaration by subscriber for Bank details:** At present, I do not have a Bank account. However, I confirm to provide the requisite Bank account details within six months or on opening of Bank account whichever is earlier to the associated nodal office for updating the same in CRA system. (Please tick (√**)** in case, Bank details are not available)

12. Value Added Services: i) SMS Alert Yes ☐ No ☐

ii) Email Alert: Yes ☐ No ☐

I ____________________________________________________________ , the applicant, do hereby declare that what is stated above is true to the best of my information & belief.

Date :

D D M M Y Y Y Y

Signature/Left Thumb Impression of Subscriber

**Section B - Subscribers Employment Details to be filled and attested by DDO** (All Details are Mandatory)

1. Date of Joining

DDM M YYYY

2. Date of Retirement

DDM MY YYY

3. PPAN (Please refer to instructions No.5.)

4. Group of the Employee (Please Tick) Group A ☐ Group B ☐ Group C ☐ Group D ☐

5. Office

6. Department

7. Ministry

8. DDO Registration Number

9. PAO/CDDO Registration Number (Please refer to instructions No.6.)

10. Basic Salary

11. Pay Scale

Certified that the above declaration has been signed / thumb impressed before me by ________________________________________________ after he / she has read the entries / entries have been read over to him / her by me and got confirmed by him / her. Also certified that the date of birth and employment details is as per employee records available with the **Department.**

Signature of the Authorised Person

Designation of the Authorised Person : _______________________________

Date :

D D M M Y Y Y Y

Rubber Stamp of the DDO

Name of the DDO ______________________

Department / Ministry ______________________

